१९९१ च्या लोकसंख्येच्या आधारे निकषानुसार
नवीन आरोग्य संस्थांना मंजूरी देण्याबाबतचे
धोरण [ बृहत आराखड्यास मान्यता ].

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र. पीएचसी-१०९४/४१९९/प्र.क्र.१३/९५/आरोग्य-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- १ जानेवारी, १९९६.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र शासनाने इ.स. २००० पर्यन्त सर्वांसाठी आरोग्य पुरविण्याचे ध्येय अंगिकारले असून आतापर्यन्त १९८७ च्या लोकसंख्येच्या आधारावर शासनाने राज्यात ९७२५ उपकेंद्रे, १६७ प्रा.आ.पथके, ६२ फिरती आरोग्य पथके, १६९५ प्रा.आ.केंद्रे व २९५ ग्रामीण रुग्णालये [ कुटीर रुग्णालयांसह ] मंजूर केलेली आहेत. या संस्थांपैकी उपकेंद्रे, प्रा.आ.केंद्रे व ग्रामीण रुग्णालये केंद्र शासनाने विहित केलेल्या व राज्य शासनाने स्वीकारलेल्या निकषानुसार मंजूर करण्यात येतात. तथापि ती मंजूर करतांना आरोग्य सेवा सुविधा जनतेस जास्तीत जास्त मध्यवर्ती व इतर वाहय सुविधा उपलब्ध असलेल्या ठिकाणी मंजूर करण्याच्या दृष्टीने काही विहित निकषाच्या आधारावर मंजूर करुन या संस्थांच्या कार्यात सुसूत्रता आणणे व त्यानुसार १९९१ च्या लोकसंख्येच्या आधारावर निकषानुसार अतिरिक्त आरोग्य संस्था निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तसेच अलिकडेच काही स्वयंसेवी संस्थांनाही अशा प्रकारच्या आरोग्य संस्था शासनाच्या मदतीने किंवा स्वतःच्या अर्थबळावर स्थापण्यास सहभाग दर्शविला आहे. या संस्थांचा सहभाग निश्चित करण्यास मंजूरी देण्यापूर्वी मंजूर करणे आवश्यक असलेल्या आरोग्य संस्थांचा संपूर्ण आराखडा निश्चित करणे आवश्यक आहे. म्हणजे ज्या ठिकाणी स्वयंसेवी संस्था स्थापण्यास उत्सुक असतील त्यांना आराखड्यात मंजूर केलेल्या संस्थांपैकी काही आरोग्य संस्था शासन व स्वयंसेवी संस्थांना आपापसात मान्य असलेल्या ठिकाणी स्थापण्यास परवानगी देता येणे शक्य होईल.

२. या सर्व बाबींचा विचार करुन शासनाने १९९१ च्या लोकसंख्येच्या आधारावर आदिवासी, बिगर आदिवासी तसेच डोंगरी क्षेत्राच्या प्रचलित निकषावर मंजूर करण्याच्या संस्थांच्या संख्यात्मक आराखड्यास मंजूरी दिलेली असून त्यानुसार राज्यात ९८ ग्रामीण रुग्णालय, ४१६ प्रा.आ.केंद्रे व २५३८ उपकेंद्रे निर्माण करण्याचा निर्णय घेतलेला आहे. तथापि आर्थिक बाबींचा विचार करता

...२...

या संस्था एकदम मंजूर करता येणे शक्य नसल्यामुळे आरोग्य विभागात जिल्हा योजनांतर्गत येत्या काही वर्षांत उपलब्ध होणाऱ्या निधीच्या प्रमाणात त्या मंजूर करण्यात येणार आहेत. या आरोग्य संस्थांपैकी मंजूर करण्यात येणाऱ्या ग्रामीण रुग्णालयांच्या बाबतीत ही रुग्णालये सध्या ज्या तालुक्यात मंजूर नाहीत त्या ठिकाणी मंजूर करण्यात प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतर प्रा.आ.केंद्राच्या संख्येच्या संदर्भात त्या तालुक्यात ग्रामीण रुग्णालयाचा अनुशेष असेल त्या तालुक्यातील इतर महत्त्वाच्या ठिकाणी ती स्थापण्याचा विचार करण्यात येईल. तसेच यापूर्वी ज्या काही प्रा.आ.केंद्राचे श्रेणीवर्धन करून ग्रामीण रुग्णालये मंजूर करण्यात आली आहेत, त्या ठिकाणी अस्तित्वात असलेली प्रा.आ.केंद्रे इतरत्र हलविण्याच्या निरनिराळ्या स्तरावरून आलेल्या मागण्यांचा विचार करून शासनाने असा निर्णय घेतला आहे की, प्रा.आ.केंद्रांचे श्रेणीवर्धन करून ज्या ठिकाणी ग्रामीण रुग्णालये मंजूर करण्यात आले तेथील प्रा.आ.केंद्र वेगळे करून ते १९९१ च्या लोकसंख्येनुसार प्रा.आ.केंद्राचा अनुशेष असल्यास त्या तालुक्यात व तालुक्यात अनुशेष नसल्यास त्या जिल्ह्यातील ज्या तालुक्यात प्रा.आ.केंद्राचा अनुशेष आहे तेथे मंजूर करावे. अशा प्रकारे मंजूर करावयाचे ठरलेल्या ९८ ग्रामीण रुग्णालये ११६ प्रा.आ.केंद्रे व २५३८ उपकेंद्रे यांचा संख्यात्मक आराखडा या सोबत प्रपत्र "अ" मध्ये दर्शविलेला आहे. आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत तसेच डोंगरी क्षेत्रात मंजूर करावयाच्या आरोग्य संस्थांची संख्याही या प्रपत्रात दर्शविलेली आहे.

३. वर नमूद केल्याप्रमाणे या आरोग्य संस्था मंजूर करताना लक्ष देणे आवश्यक असलेली सर्वात महत्त्वाची बाब म्हणजे या आरोग्य संस्था जनतेच्या सोयीच्या दृष्टीने मध्यवर्ती असे ठिकाण निश्चित करून स्थापन करणे आवश्यक आहे. त्यासाठी ठिकाणे निश्चित करण्यासाठी, शासनाने मान्यता दिलेली मार्गदर्शक तत्वेही या निर्णयासोबत (प्रपत्र-ब) जोडण्यात आलेली आहेत. या मार्गदर्शक तत्वानुसार जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा शल्य चिकित्सक व मंडळाचे आरोग्य उपसंचालक यांनी ....

आवश्यक ते प्रस्ताव जिल्हा नियोजन व विकास मंडळास सादर करावा व जिल्हा नियोजन व विकास मंडळाने ठिकाणे निश्चित करुन ती संबंधित जिल्ह्याच्या पालकमंत्र्यांच्या सहमतीने/शिफारशीसह शासनाकडे पाठवावयाची आहेत. त्याबरोबरच मंजूर करावयाच्या आरोग्य संस्थांचा प्राथम्यक्रमही जिल्हा नियोजन व विकास मंडळाने ठरविणे आवश्यक आहे.

४. वरीलप्रमाणे प्राथम्यक्रम ठरल्यानुसार संबंधित जिल्हा विकास व नियोजन मंडळाने त्यासाठी आवश्यक त्या निधीची तरतूद त्यांच्या वार्षिक योजनांत केल्यानंतरच या संस्था शासनाकडून मंजूर करण्याची कार्यवाही करण्यात येईल. त्यामुळे संबंधित जिल्हा नियोजन व विकास मंडळाने आपापल्या जिल्ह्यात किती व कोणत्या संस्था प्राथम्याने मंजूर करावयाच्या आहेत हे निश्चित करुन त्यानंतर वार्षिक योजनात समावेश करुन आवश्यक ती तरतूदही करणे आवश्यक आहे.

५. वरीलप्रमाणे प्राथम्यक्रम व संस्थांची ठिकाणे निश्चित केल्यावर ग्रामीण रुग्णालयासारख्या काही संस्था स्वयंसेवी संस्थांकडून केंद्रशासन व राज्यशासन यांच्याकडून मिळणाऱ्या अनुदानाच्या आधारावर मंजूर करण्याचे प्रस्ताव प्राप्त झाल्यास यापैकी ग्रामीण रुग्णालय किंवा तत्सम संस्था अशा संस्थामार्फत स्थापन करण्यास परवानगी देण्याचा विचार केला जाईल.

६. मंजूर करण्यात यावयाच्या आरोग्य संस्थांस [ग्रामीण रुग्णालये,प्रा. आ.केंद्रे व उपकेंद्रे] मंजूर करावयाच्या कर्मचाऱ्यांच्या प्रमाणकासही मान्यता देण्यात येत असून त्यानुसार प्रपत्र "क" मध्ये दर्शविल्याप्रमाणे वैद्यकीय अधिकारी व इतर कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येईल. तसेच प्रा.आ.केंद्रात जीप व ग्रामीण रुग्णालयांना रुग्णवाहिका व क्ष-किरण यंत्रेही मंजूर करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ ज. मं. प्रधान ]
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रति,
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
महालेखापाल [लेखा परीक्षा]/[लेखा अनुज्ञेयता], मुंबई/नागपूर.

..४/-

महसंचालक, आरोग्य सेवा [निविदु] मुंबई.
महसंचालक, आरोग्य सेवा [अ.] पुणे.
अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण ना.वा.सं. व शा.आ.पुणे.
आरोग्य सेवा उपसंचालक, प्रभारी सर्व आरोग्य मंडळे.
सर्व जिल्हा शल्यचिकित्सक,
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा अधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
आरोग्य-८ कार्यासन ] सार्वजनिक आरोग्य विभाग
अर्थसंकल्प कार्यासन ]
आस्थापना कार्यासन ] मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती, आरोग्य-८ ]